महाराष्ट्र राज्य सहकारी कृषी ग्रामीण बहुउद्देशीय विकास बँक मर्या., मुंबई व जिल्हा सहकारी कृषी ग्रामीण बहुउद्देशीय विकास बँकांबाबत धोरणात्मक निर्णय घेणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्र. एलडीबी-१०१६/प्र.क्र. ६९/७-स,**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
दिनांक : -०३ ऑगस्ट, २०१७.

वाचा :- शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. एलडीबी १०१३/प्र.क्र. ६९९/७-स दि.२४.०७.२०१५.

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र राज्य सहकारी कृषी ग्रामीण बहुउद्देशीय विकास बँक मर्या., मुंबई (शिखर भूविकास बँक) व २९ जिल्हा भूविकास बँकांच्या बाबत धोरणात्मक निर्णय दि. २४.०७.२०१५ रोजीच्या शासन निर्णयान्वये घेण्यात आला आहे. सदर निर्णयाची अंमलबजावणी करण्यासाठी सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांनी दि. ३१.१०.२०१५ रोजी जिल्हा भू-विकास बँकांचे सर्व अवसायक तथा जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था यांना सविस्तर सूचना निर्गमित केल्या आहेत.

सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांच्या दि. ३१.१०.२०१५ रोजीच्या पत्रास अनुसरून विविध जिल्हा भू-विकास बँकांच्या कर्मचाऱ्यांनी मा. उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर येथे याचिकेद्वारे आव्हान दिले होते. (याचिका क्र. ६४०१/२०१५, ६३५१/२०१५, ६०८८/२०१५, ६१७४/२०१५, ६४०६/२०१५, ६४४९/२०१५, ६५२७/२०१५ आणि ६४७७/२०१५) सदर याचिकांबाबत मा. उच्च न्यायालयात सुनावणी होऊन या प्रकरणी मा. उच्च न्यायालयाने दि. २१.३.२०१६ रोजी आदेश दिला आहे.

सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांच्या दि. ३१.१०.२०१५ च्या पत्रातील सूचना दि.२४.०७.२०१५ च्या शासन निर्णयाशी सुसंगत नसल्याबाबत मा. उच्च न्यायालयाने दि. २१.०३.२०१६ च्या आदेशात निरिक्षण नोंदविले आहे. तसेच या संदर्भात आवश्यक तो धोरणात्मक निर्णय घेण्याबाबत अथवा यापूर्वी घेतलेल्या धोरणात्मक निर्णयात कायद्यातील तरतूदीच्या अनुषंगाने सुधारणा करण्याबाबत शासनास मुभा राहील, असेही मा. उच्च न्यायालयाने सदर आदेशात नमूद करुन उपरोक्त याचिका निकाली काढल्या आहेत. मा. उच्च न्यायालयाच्या उपरोक्त आदेशानुसार संदर्भाधीन शासन निर्णयामध्ये सुधारणा करण्याची बाब शासनस्तरावर विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

दिनांक. १८.०७.२०१७ रोजी झालेल्या मंत्रीमंडळ बैठकीतील निर्णयानुसार संदर्भाधीन दिनांक २४.७.२०१५ रोजीच्या शासन निर्णयातील मुद्दा क्र. अ (१) व क (१) मध्ये सुधारणा करण्यात येत असुन सदर मुद्दे खालीलप्रमाणे वाचण्यात यावेत.

**अ) १ :- महाराष्ट्र राज्य सहकारी कृषि ग्रामीण बहुउद्देशीय विकास बँक मर्या, मुंबई (शिखर बँक) व जिल्हा भूविकास बँकांची अवसायन प्रक्रिया :-**

भूविकास बँकांच्या अवसायन प्रक्रियेच्या अनुषंगाने ज्या प्रकरणी मा. उच्च न्यायालयाने स्थगिती दिली आहे अशा प्रकरणी अवसायन प्रक्रिया चालू ठेवण्याबाबत शिखर बँकेच्या संदर्भात सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे व जिल्हा भूविकास बँकाबाबत संबंधित जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था व दोन जिल्हे कार्यक्षेत्र असणा-या जिल्हा भूविकास बँकासंदर्भात संबंधित विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था यांनी मा. उच्च न्यायालयात विनंती अर्ज दाखल करावा. तसेच ज्या जिल्हा भूविकास बँकांच्या अवसायन प्रक्रियेस मा. उच्च न्यायालयाने स्थगिती दिलेली नाही अशा जिल्हा भू-विकास बँकांच्या अवसायनाची प्रक्रिया पुढे चालू ठेवण्यात यावी.

**क) १:- भूविकास बँक कर्मचाऱ्यांची देणी तसेच सेवा विषयक बाबी :-**

शेतकऱ्यांकडील कर्जाची वसुल होणारी रक्कम व शिखर बँकेकडे सध्या उपलब्ध असलेल्या निधीतून शिखर बँकेच्या कार्यरत कर्मचाऱ्यांना नुकसान भरपाईसाठी लागणारी रक्कम व शिखर बँकेच्या अवसायन प्रक्रियेसाठी लागणारी रक्कम वजा जाता उपलब्ध असलेल्या निधीतून जिल्हा भूविकास बँकांच्या सध्या कार्यरत असलेल्या कर्मचाऱ्यांच्या थकीत वेतनाची रक्कम प्राधान्याने अदा करावी. तसेच या कर्मचाऱ्यांना सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांनी सन २०१२ मध्ये शिखर बँकेच्या कर्मचाऱ्यांना लागू केलेल्या स्वेच्छा निवृत्ती योजनेच्या सूत्रानुसार नुकसान भरपाईची रक्कम अदा करण्यात यावी व अशा कर्मचा-यांना बँकेच्या सेवेतून कमी करण्यात यावे. तथापि बँकेकडे कर्मचाऱ्यांना देण्यासाठी रक्कम उपलब्ध नसल्यास अशा देय रकमेबाबत योग्य तो हक्क (क्लेम) नोंदवून त्यांना सेवामुक्त करावे व रक्कम उपलब्धता व प्राधान्यक्रमानुसार संबंधीत कर्मचाऱ्यांना रक्कम अदा करावी. मात्र बँकेच्या कर्जाची वसुली व बँकेचे दैनंदिन प्रशासकीय कामकाज यासाठी अत्यावश्यक असलेला कर्मचारी वर्ग शिखर बँकेच्या बाबतीत सहकार आयुक्त व निबंधक यांच्या मान्यतेने व जिल्हा भूविकास बँकांच्या बाबतीत संबंधित जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था यांच्या मान्यतेने सेवेत ठेवण्यात यावा व त्यांच्या सेवेची निकड कमी होईल त्यानुसार वरील प्रमाणे नुकसान भरपाई रक्कमेचा क्लेम नोंदवून त्यांना सेवामुक्त करावे व रक्कम उपलब्धतेनुसार संबंधीत कर्मचा-यांना रक्कम अदा करावी.

संदर्भाधिन शासन निर्णयातील उर्वरित मुद्यांमध्ये कोणताही बदल करण्यात आलेला नाही.

हा शासन निर्णय मा. मंत्रीमंडळाच्या दि. १८.०७.२०१७ रोजी झालेल्या बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयास अनुसरुन व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. अनौसं १८२/१६/व्यय-२ दि.१८.०७.२०१६ रोजीच्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०८०३११३३५१७५०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ramesh Shankarrao Shingte

Digitally signed by Ramesh Shankarrao Shingte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-Operation, Marketing And Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fed1b2ed6e1e4aca719170d9eae8aa251ee28dc56c75d8a65acb34103d45bd48, cn=Ramesh Shankarrao Shingte
Date: 2017.08.05 12:20:29 +05'30'

**( रमेश शिंगटे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-३२.
२. मा. मंत्री (वित्त व नियोजन, वने) यांचे खाजगी सचिव.
३. मा. मंत्री (महसूल, कृषी, पशुसंवर्धन, दुग्ध विकास आणि मत्स्यव्यवसाय) यांचे खाजगी सचिव.
४. मा. मंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव
५. मा. राज्यमंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव.
६. मा. विधान सभा सदस्य / मा. विधान परिषद सदस्य (सर्व).
७. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२.
८. अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई ०३२.
९. अपर मुख्य सचिव (सामान्य प्रशासन विभाग), मंत्रालय, मुंबई ०३२.
१०.प्रधान सचिव (सहकार) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई ०३२.
११.सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१२.अवसायक, महाराष्ट्र राज्य सहकारी कृषी ग्रामीण बहुउद्देशीय विकास बँक म., मुंबई, १५-ए, मोरवी लेन, चौपाटी, मुंबई-४०० ००७.
१३.मुख्य महाप्रबंधक, राष्ट्रीय कृषि ग्रामीण विकास बँक, ५४, वेलस्ली रोड, शिवाजीनगर, पुणे-५
१४.विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (सर्व).
१५.जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था (सर्व).
१६.जिल्हा व्यवस्थापक, जिल्हा सहकारी कृषी ग्रामीण बहुउद्देशीय विकास बँक (सर्व).
१७.सर्व कार्यासने, सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१८. निवड नस्ती.